**वॉश कार्यक्रमांतर्गत शासकीय आश्रमशाळांमधील स्वच्छतागृहे/स्नानगृहांची दुरुस्ती व आवश्यकतेनुसार नवीन बांधकाम करणे, पाणी पुरवठा, भोजनगृह व हॅन्डवॉश स्टेशन्स इत्यादी सुविधा वाढविण्यासाठी "आश्रमशाळा कायापालट अभियान" राबविण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक : शाआशा-२०१५/प्रक्र.५२/का-१३,**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक ५ मे, २०१७

**वाचा :**

१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक:केआरसी-३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८, दिनांक १ सप्टेंबर, २०१४

२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक:केआरसी-३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८, दिनांक १५ डिसेंबर, २०१४

३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : शाआशा-२०१५/प्रक्र.५२/का-१३, दिनांक ११ मार्च, २०१५.

४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक:केआरसी-२०१६/प्र.क्र.१६/पापु-०८, दिनांक १३ जानेवारी, २०१६

५) आदिवासी विकास विभाग, परिपत्रक क्रमांक : शाआशा-२०१७/प्रक्र.१४०/का-१३, दिनांक ७ एप्रिल, २०१७.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने २०१९ सालापर्यंत स्वच्छ भारताचे उद्दिष्ट समोर ठेवून "स्वच्छ भारत मिशन" हा महत्वाकांक्षी कार्यक्रम दि. २ ऑक्टोबर २०१४ रोजी जाहीर केला असून "स्वच्छ भारत: स्वच्छ शाळा" हा कार्यक्रमही सुरु केला आहे. या कार्यक्रमांतर्गत सर्व शाळांमध्ये स्वच्छतेच्या सुविधा निर्माण करणे ज्यामध्ये पाणी, स्वच्छता आणि आरोग्य या मुख्य घटकांचा समावेश आहे. शासकीय आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांना स्वच्छतेच्या सवयी लावणे, त्या माध्यमातून स्वच्छतेचा प्रचार व प्रसार करणे आणि आरोग्यमान उंचावणे या उद्देशाने शासकीय आश्रमशाळांमध्ये वॉश (WASH - Water, Sanitation and Hygiene) हा कार्यक्रम राबविण्यास शासनाने दि.११ मार्च, २०१५ च्या संदर्भाकिंत शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे.

२. शासकीय आश्रमशाळांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांमध्ये वॉश कार्यक्रम राबविण्याबाबतची मानसिकता व संवेदनशिलता निर्माण व्हावी हा या कार्यक्रमाचा उद्देश असून त्याच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी सर्व शासकीय आश्रमशाळांमध्ये स्वच्छतागृहे/स्नानगृहांची दुरुस्ती करणे, आवश्यकतेनुसार स्वच्छतागृहे व स्नानगृहांचे बांधकाम करणे, पिण्याच्या स्वच्छ पाण्याचा पुरवठा, पाणी पुरवठा वितरण व्यवस्था, परिसर स्वच्छता, भोजनगृह स्वच्छता, हॅन्डवॉश स्टेशन इत्यादी सुविधा तातडीने उपलब्ध करुन देण्याची आवश्यकता आहे. या बाबींचे गांभीर्य लक्षात घेऊन सचिव, आदिवासी विकास विभाग यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १० व ११ एप्रिल, २०१७ रोजी यशदा, पुणे येथे पार पडलेल्या बैठकीमध्ये वॉश कार्यक्रम मोहीम तत्वावर कालबध्द पध्दतीने राबविण्यासाठी रुपरेषा, सहभागी होणा-या संस्था, प्रशिक्षणाचे स्वरुप,कालबध्द अंमलबजावणी व त्यासाठी संबंधितांची जबाबदारी निश्चित करण्याबाबत विचारविनिमय करण्यात आला. त्यानुसार वॉश

कार्यक्रमाची एक मोहीम म्हणून प्रभावीपणे अंमलबजावणी होण्याकरीता शासकीय आश्रमशाळांमधील स्वच्छतागृहे/स्नानगृहांची दुरुस्ती करणे, आवश्यकतेनुसार स्वच्छतागृहे/स्नानगृहांचे तसेच हॅन्डवॉश स्टेशनचे नवीन बांधकाम करणे, पिण्याच्या स्वच्छ पाण्याचा पुरवठा, पाणी पुरवठा वितरण व्यवस्था, परिसर स्वच्छता व भोजनगृह स्वच्छता करणे तसेच सदर वॉश कार्यक्रम राबविण्यासाठी शिक्षक, शिक्षकेतर कर्मचारी व विद्यार्थ्यांना प्रशिक्षण देण्याकरीता मुख्य प्रशिक्षकांची निवड करुन त्यांना प्रशिक्षण देणे इत्यादी कामांमध्ये शासन यंत्रणेस सहाय्य करण्यासाठी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या दि.१३ जानेवारी, २०१६ च्या परिपत्रकानुसार निवड केलेल्या मुख्य संसाधन संस्थांना सहभागी करुन ही मोहीम कालबध्द पध्दतीने शासकीय आश्रमशाळांमध्ये राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

शासकीय आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांना स्वच्छतेच्या सवयी लावणे, त्या माध्यमातून स्वच्छतेचा प्रचार व प्रसार करणे आणि आरोग्यमान उंचावणे या उद्देशाने शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहांमध्ये वॉश (WASH - Water, Sanitation and Hygiene) हा कार्यक्रम राबविण्यास शासनाने दि.११ मार्च, २०१५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. शासकीय आश्रमशाळांमध्ये वॉश कार्यक्रमाची एक मोहीम म्हणून प्रभावी अंमलबजावणी होण्याकरीता आश्रमशाळांमधील स्वच्छतागृहे/ स्नानगृहांची दुरुस्ती करणे, आवश्यकतेनुसार स्वच्छतागृहे/ स्नानगृहांचे व हॅन्डवॉश स्टेशनचे नवीन बांधकाम करणे, पाणी पुरवठा व भोजनगृह स्वच्छता करणे तसेच वॉश कार्यक्रम राबविण्यासाठी “आश्रमशाळा कायापालट अभियान” कालबध्द पध्दतीने राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. याअंतर्गत प्रथम मुख्य प्रशिक्षकांचे प्रशिक्षण घेणे, मुख्य प्रशिक्षकांकडून आश्रमशाळेतील कर्मचारी व विद्यार्थांना प्रशिक्षण देणे, पाणी पुरवठा व स्वच्छता सेवांची वृध्दी करण्यासाठी अंदाजपत्रके तयार करुन अंमलबजावणी करणे इत्यादी घटकांचा समावेश राहील. या अभियानातंर्गत खालीलप्रमाणे कालबध्द अंमलबजावणी करावयाची आहे :-

१) वॉश (WASH) कार्यक्रम राबविण्यासाठी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाव्दारे निवड केलेल्या मुख्य संसाधन संस्थांमधून (KRC) व आश्रमशाळेतील कर्मचा-यांमधून किमान २०० मुख्य प्रशिक्षक तयार करण्यात यावेत.

२) मुख्य प्रशिक्षकासाठी ५ शासकीय आश्रमशाळांकरीता १ याप्रमाणे एका कर्मचा-याची निवड संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दि.८/५/२०१७ पर्यंत करुन अपर आयुक्त यांच्यामार्फत आयुक्तालयास कळवावे.

३) राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय मुख्य संसाधन संस्थांची या कार्यक्रमामध्ये सहभागी होण्यासाठी स्वतंत्रपणे सहमती घेऊन मुख्य संसाधन संस्थांना (KRC) त्यांचा एक व्यक्ती हा मुख्य प्रशिक्षकांच्या प्रशिक्षणासाठी उपस्थित राहण्याबाबत आयुक्तालयाकडून दि.८/५/२०१७ पर्यंत कळविण्यात यावे.

४) वॉश कार्यक्रम व त्याच्या अंमलबजावणीची माहिती मिळावी यासाठी आदिवासी विकास विभागांतर्गत असलेल्या बांधकाम कक्षातील कनिष्ठ अभियंता व उप अभियंता यांना सदर प्रशिक्षण द्यावयाचे असल्याने त्यांची यादी मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय यांनी आयुक्तालयास दि.८/५/२०१७ पर्यंत पाठवावी.

५) मुख्य प्रशिक्षकांचे प्रशिक्षण हे अपर आदिवासी आयुक्त यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रनिहाय आयोजित करावे. सदर प्रशिक्षण युनिसेफच्या तज्ज्ञांकडून देण्यात येणार असून प्रशिक्षणाचा कालावधी ३ दिवसांचा राहील. प्रशिक्षण देणा-या तज्ज्ञांचा खर्च युनिसेफव्दारे करण्यात येईल. या प्रशिक्षणाचे मराठी मॉडयुल युनिसेफकडून तयार करुन घेण्यात यावे.

६) अपर आयुक्त, आदिवासी विकास व युनिसेफ यांच्यामार्फत मुख्य प्रशिक्षकांचे प्रशिक्षण आयोजित करावे. या प्रशिक्षणाचे नियोजन अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी युनिसेफच्या अधिका-यांशी चर्चा करुन समन्वयाने निश्चित करावे. मुख्य प्रशिक्षकांचे प्रशिक्षण अपर आदिवासी आयुक्त क्षेत्रनिहाय आयोजित करावयाचे असून त्यासाठी प्रशिक्षणार्थींची संख्या, प्रशिक्षणाचे स्थळ, प्रशिक्षणाचा कालावधी इत्यादीचे विवरण प्रपत्र-१ मध्ये नमूद केले आहे. अपर आदिवासी आयुक्त यांनी विहित कालावधीत सदर प्रशिक्षण आयोजित करावे.

७) सदर ३ दिवसांचे प्रशिक्षण सुरु होण्यापुर्वी मुख्य प्रशिक्षकांची निवड झालेल्या कर्मचा-यांनी आश्रमशाळांमध्ये सद्य:स्थितीत असलेली स्वच्छतागृहे, स्नानगृहे, हॅन्डवॉश स्टेशन, भोजनगृह, पाणी पुरवठा व्यवस्था इत्यादीची उपलब्धता, नवीन बांधकाम वा दुरुस्तीची आवश्यकता इत्यादीची प्राथमिक माहिती विहित प्रपत्रात तयार करावी. सदर प्रपत्र युनिसेफ व मुख्य संसाधन संस्था यांनी संयुक्तपणे तयार करुन मुख्य प्रशिक्षणार्थींना उपलब्ध करुन द्यावे.

८) मुख्य प्रशिक्षकांच्या प्रशिक्षणादरम्यान मुख्य संसाधन संस्थाकडून (KRC) शासकीय आश्रमशाळांमधील पाणी पुरवठा व्यवस्था, स्वच्छतागृहे/स्नानगृहे, हॅन्डवॉश स्टेशन, भोजनगृह इत्यादींची दुरुस्ती वा आवश्यक नवीन बांधकामाचे आराखडे तयार करण्यात यावेत.

९) मुख्य संसाधन संस्थांचे मुख्य प्रशिक्षक यांना प्रशिक्षण कालावधीमध्ये द्यावयाचे मानधन तसेच आयुक्तालयातील कर्मचा-यांमधून नेमण्यात आलेल्या मुख्य प्रशिक्षकांचे मानधन आयुक्त, आदिवासी विकास यांनी निश्चित करावे तसेच मुख्य संसाधन संस्थांच्या मुख्य प्रशिक्षकांचे प्रवास भत्ते अदा करण्यात यावेत.

१०) मुख्य प्रशिक्षकांचे प्रशिक्षण झाल्यानंतर प्रकल्पस्तरीय २ दिवसांचे प्रशिक्षण हे जून २०१७ मध्ये आयोजित करण्यात यावे, ज्यामध्ये शासकीय आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना वॉश कार्यक्रमांसदर्भात प्रशिक्षित करण्यात यावे. सदर प्रशिक्षण संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी आयोजित करावे.

११) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या दि.१३ जानेवारी, २०१६ च्या परिपत्रकानुसार या मुख्य संसाधन संस्था पाणी पुरवठा व स्वच्छताविषयक सेवांचे प्रकल्प अहवाल तयार करणे, प्रकल्प अंमलबजावणी करणे आणि प्रकल्प अहवाल व अंमलबजावणी अशी दोन्ही कामे करणा-या संस्थाचा समावेश आहे. त्यानुसार अतिरिक्त आदिवासी आयुक्त यांनी उपरोक्त दि.१३ जानेवारी २०१६ च्या परिपत्रकानुसार मुख्य संसाधन संस्थांकडून सिमित निविदा प्रक्रिया (Internal and Closed Bidding) पार पाडून या संस्थांची निवड करावी व कामनिहाय दरनिश्चिती करुन त्यांना क्षेत्रनिहाय आश्रमशाळांसाठी वॉश कार्यक्रमांतर्गत आराखडे तयार करण्याचे काम देण्यात यावे.

१२) वॉश पुर्ततेसाठी शासकीय आश्रमशाळांमध्ये पर्याप्त पाणी पुरवठा व्यवस्था, स्वच्छतागृहे व स्नानगृहांचे नवीन बांधकाम करणे वा दुरुस्ती करणे, हॅन्डवॉश स्टेशन, भोजनगृह इत्यादीचे अंदाजपत्रक व आराखडे मुख्य संसाधन संस्थाकडून तयार करुन घेण्यात यावे. या मोहिमेंतर्गत शक्यतो कमी खर्चाची कामे घेण्यात यावीत व ती स्थानिकरित्या पूर्ण करण्यात

यावीत. यासाठी आश्रमशाळा स्तरावर कर्मचा-यांच्या विविध समित्या स्थापन करुन त्याची अंमलबजावणी करण्यात यावी. सदर कामे शाळा व्यवस्थापन समितीच्या संनियंत्रणाखाली करण्यात यावीत व या कामांची नोंद व हिशोब स्वतंत्रपणे ठेवण्यात यावा. विहित मर्यादेबाहेरील कामांचे आराखडे आदिवासी विकास विभागांतर्गत स्थापन करण्यात आलेल्या बांधकाम व्यवस्थापन कक्षातील सक्षम अभियंत्यांकडून तपासून घ्यावेत.

१३) अंदाजपत्रके तयार करण्यासाठी मुख्य संसाधन संस्थांकडून ज्या क्षेत्रामध्ये प्रतिसाद मिळणार नाही अशा क्षेत्रातील आश्रमशाळांची सविस्तर अंदाजपत्रके स्थानिक अभियांत्रिकी महाविद्यालयाकडून तयार करण्यात यावीत.

१४) सदर कामे शाळा सुरु होण्यापुर्वी करावयाची असल्याने संबंधित प्रकल्प अधिकारी व आश्रमशाळांचे मुख्याध्यापक यांनी त्याच्या अंमलबजावणीचे नियोजन करावे व अपर आदिवासी आयुक्त यांनी संनियंत्रण करावे.

१५) शाळा सुरु झाल्यानंतरसुध्दा मुख्य प्रशिक्षकाकडून प्रत्येक आश्रमशाळेतील कर्मचारी व विद्यार्थी यांच्यासाठी २ दिवसांचे प्रशिक्षण देण्यात यावे. सदर प्रशिक्षण शाळा सुरु झाल्यापासून २० जुलै, २०१७ पर्यत आयोजित करण्यात यावे व यामध्ये प्रामुख्याने स्वच्छतेचे महत्व, योग्य सवयी, वॉश इत्यादीबाबत माहिती देण्यात यावी. आयुक्तालयातील मुख्य प्रशिक्षकांनी आश्रमशाळेतील कर्मचारी व विद्यार्थी यांना या विषयाबाबत नियमितपणे माहिती देणे व जागृती निर्माण करण्यासाठी त्रैमासिक प्रशिक्षणाचे वेळापत्रक संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी तयार करावे व त्याची अंमलबजावणी करण्यासाठी नियोजन करावे.

१६) शासकीय आश्रमशाळांमध्ये वरीलप्रमाणे पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधा वाढविण्यासाठी मोहीम तत्वावर अंमलबजावणी करावयाची आहे. त्याच धर्तीवर शासकीय वसतीगृहांमधील पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधा वाढविण्यासाठी स्वतंत्र मोहीम ऑगस्ट, २०१७ पासून राबविण्यात यावी. त्यासाठी आयुक्त, आदिवासी विकास, अपर आदिवासी आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांनी आगाऊ नियोजन करावे.

१७) शासकीय आश्रमशाळांमध्ये उन्हाळी सुट्यांमध्ये विशेष दुरुस्तीची कामे करण्याबाबत संदर्भाकिंत दि.७ एप्रिल, २०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये सूचना दिलेल्या आहेत. त्याअतंर्गत करण्यात येणारी कामे आणि पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधा विहित कालावधीत उपलब्ध करुन देण्यासाठी राबवावयाच्या आश्रमशाळा कायापालट अभियानामध्ये उत्कृष्ट कामगिरी बजावणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना प्रोत्साहनपर पारितोषिक व प्रशस्तीपत्र देऊन गौरविण्यात येईल. यासाठी आयुक्त, आदिवासी विकास यांनी कामगिरीचे निकष/मापदंड निश्चित करावेत व प्रोत्साहनाचा प्रस्ताव तयार करुन तो शासनास सादर करावा. सदर प्रोत्साहनपर पारितोषिक व प्रशस्तीपत्र शासकीय वसतीगृहासाठी राबवावयाच्या मोहिमेसाठीसुध्दा अनुज्ञेय राहील.

१८) "आश्रमशाळा कायापालट अभियानाची" प्रभावी व कालबध्द अंमलबजावणीसाठी पर्याप्त संनियंत्रण व्हावे यासाठी एक माहिती व्यवस्थापन प्रणाली (MIS) तयार करण्यात यावी, ज्यावर प्रकल्प कार्यालयाने साप्ताहिक प्रगती अहवाल उपलब्ध करुन द्यावा. यामध्ये संबंधित आश्रमशाळेतील सध्याची पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधांची सद्य:स्थिती व छायाचित्र आणि या मोहिमेंतर्गत करण्यात येणा-या दुरुस्तीनंतरची सद्य:स्थिती व छायाचित्र उपलब्ध करुन देण्यात यावे. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी आश्रमशाळा कायापालट अभियानांतर्गत होणा-या कामाचा साप्ताहिक आढावा घेऊन त्याचा अहवाल शासनास उपलब्ध करुन द्यावा.

३. सदर मोहिमेंतर्गत प्रशिक्षणावरील खर्च आश्रमशाळा समूह (२२२५ डी ७३४) या अंतर्गत व वॉश मोहिमेंतर्गत नवीन बांधकामे देखभाल व दुरुस्तीवरील खर्च शाळा व्यवस्थापन निधी व आश्रमशाळांची दुरुस्ती या लेखाशिर्षाखालील तरतुदीतून भागविण्यात यावा. सदर कामांसाठी वाढीव निधीची आवश्यकता भासल्यास शासनस्तरावरुन अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharasthra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०५०६१७१७४२२१२४ असा आहे. हे शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2017.05.06 17:20:43 +05'30'

**(सु. ना. शिंदे)**
उप सचिव, आदिवासी विकास विभाग

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३) मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
५) सर्व मा.विधिमंडळ सदस्य
६) सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक
७) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
८) सर्व विभागीय आयुक्त
९) सर्व जिल्हाधिकारी
१०) अपर आदिवासी आयुक्त (सर्व) आदिवासी विकास,
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१२) प्रकल्प अधिकारी (सर्व), एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१३) युनिसेफचे महाराष्ट्र प्रतिनिधी, अंधेरी, मुंबई
१४) महालेखापाल (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१५) महालेखापाल (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
१६) सर्व निवासी लेखा परीक्षा अधिकारी
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८) मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) अधिक्षक अभियंता/उप अभियंता/कनिष्ठ अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२१) निवड नस्ती/कार्यासन-१३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

## शासन निर्णय क्रमांक : शाआशा-२०१५/प्रक्र.५२/का-१३, दिनांक ५ मे, २०१७ चे सहपत्र

### प्रपत्र-१

| मुख्य प्रशिक्षकांचे प्रशिक्षण | अमरावती | नागपूर | ठाणे | नाशिक |
|---|---|---|---|---|
| **अतिरिक्त आदिवासी आयुक्तनिहाय प्रशिक्षणाचे ठिकाण** | प्रबोधिनी, अमरावती | वनामती, नागपूर | यशदा, | यशवंतराव चव्हाण ॲकेडमी |
| **आश्रमशाळांची संख्या** | **८१** | **८३** | **१२८** | **२२२** |
| **आयुक्तालयातील मुख्य प्रशिक्षणासाठी नेमावयाचे कर्मचारी** | १६ | १७ | २६ | ४४ |
| **मुख्य संसाधन संस्थांची संख्या (जिल्हा)** | १४ | १६ | ९ | १२ |
| **मुख्य संसाधन संस्थांची संख्या (राज्य)** | ४ | १ | १५ | १ |
| **कनिष्ठ अभियंता व उप अभियंता** | १३ | १५ | ७ | १४ |
| एकूण प्रशिक्षणार्थी | **४७** | **४९** | **५७** | **७१** |
| **अपर आयुक्त व प्रकल्प कार्यालयातील समन्वय अधिकारी** | उप आयुक्त, अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचे कार्यालय, अमरावती | उप आयुक्त, अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचे कार्यालय, नागपूर | उप आयुक्त, अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचे कार्यालय, ठाणे | उप आयुक्त, अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचे कार्यालय, नाशिक |
| **मुख्य प्रशिक्षकांना प्रशिक्षण देणारी संस्था** | युनिसेफ | युनिसेफ | युनिसेफ | युनिसेफ |
| **प्रशिक्षण सुरु होण्याचा दिनांक** | **१५/५/२०१७** | **१९/५/२०१७** | **२३/५/२०१७** | **२९/५/२०१७** |